**तत्कालीन पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाने सन १९७२ ते १९८३ या कालावधीत संपादित केलेल्या जमिनींच्या मोबदल्यात संबंधित शेतकऱ्यांना ६.२५% जमीन परतावा देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एमआरडी-३३२२/प्र.क्र.२१४/नवि-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक:- १४ मार्च, २०२४.

**वाचा-**

१. तत्कालीन पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाने प्राधिकरण सभा क्र.२१६, विषय क्र.११, दि.२३.०५.२००१.
२. यापूर्वीचे शासन निर्णय दि.०३.०३.१९९० व दि.१५.०९.१९९०
३. तत्कालीन पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. विप्रा/भूवि/१२.५/३९८१, दि. २१.०६.१९९९ व तदनंतर पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाचे विविध दिनांकीत प्राप्त प्रस्ताव.
४. महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.जमीन व मालमत्ता विभाग/प्राधिकरण/४८६४, दि.११.१२.२०२३
५. नगर विकास विभाग अधिसूचना क्र. टीपीएस-१८२१/२२१/प्र.क्र.४३/२०२१/नवि-१३, दि. ७ जून, २०२१

**प्रस्तावना:-**

तत्कालीन पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाची स्थापना महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम, १९६६ नुसार दिनांक १४.०३.१९७२ साली करण्यात आली. त्यावेळी चिंचवड, आकुर्डी, निगडी, भोसरी, वाकड, थेरगांव, रावेत, रहाटणी, मोशी, चिखली या गावांतील स्थानिक शेतकऱ्यांच्या जमिनी संपादित करण्यात आल्या होत्या. या संपादित केलेल्या जमिनींच्या अनुषंगाने राज्य शासनाने दि.०३.०३.१९९० च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०३.०३.१९९० नंतर संपादित करण्यात आलेल्या जमिनीच्या भू-धारकांना १२.५% जमीन परत देण्याची योजना अटी व शर्तीनुसार लागू करण्यात आली. तसेच दिनांक १५.०९.१९९३ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०१.१९८४ नंतर संपादित करण्यात आलेल्या जमीनधारकांना सुध्दा १२.५% जमीन परत देण्याची योजना अटी व शर्तीनुसार लागू करण्यात आली. दि. ७ जून, २०२१ रोजीच्या अधिसूचनेनुसार पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाचे पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामध्ये विलिनीकरण करण्यात आले आहे.

सन १९८४ पूर्वी ज्या शेतकऱ्यांच्या जमिनी संपादित करण्यात आल्या व ज्यांनी प्राधिकरणास ताबा दिला आहे, अशा शेतकऱ्यांना वरील शासन निर्णयानुसार १२.५% जमीन परताव्याचा लाभ मिळत नसल्याने त्यांना सुध्दा ही योजना लागू करण्याची मागणी संबंधित जमीन मालकांकडून विविध स्तरावरून शासनास होत आहे. या अनुषंगाने विधीमंडळातही विविध लोकप्रतिनिधींकडून मागणी करण्यात आली होती. या बाबी विचारात घेऊन तत्कालीन पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाने सन १९७२ ते १९८४ या कालावधीत संपादित केलेल्या जमिनींच्या मोबदल्यात संबंधित शेतकऱ्यांना ६.२५% जमीन परतावा देण्यास शासनाची मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. तत्कालीन पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाकरिता या प्राधिकरणाच्या स्थापनेपासून म्हणजेच दि. १४/०३/१९७२ ते दि.३१/१२/१९८३ या कालावधीत ज्या शेतकऱ्यांच्या जमिनी संपादित करण्यात आल्या आहेत अशा संपादीत जमिनींकरिता संबंधित जमीन मालकांना ६.२५% प्रमाणे जमीन परतावा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. संबंधित जमीन मालकांना परत करावयाची ६.२५ टक्के विकसित जमीन प्राधिकरणामार्फत शक्य असल्यास ज्या गावांतील जमीन संपादित केली असेल तेथे देण्यात येईल. जर त्या गावात तेवढी जमीन उपलब्ध नसेल तर दुसऱ्या गावात उपलब्धतेनुसार वितरीत करण्यात येईल.

३. सन १९७२ ते १९८३ या कालावधीत संपादीत क्षेत्राच्या जमिनीचा मोबदला ज्या शेतकऱ्यांनी यापूर्वीच घेतला आहे, त्यांना या निर्णयानुसार ६.२५ टक्के प्रमाणे जमीन परतावा करण्यापूर्वी त्यांनी तेवढ्या प्रमाणात जमीन मोबदला रक्कम सव्याज (व्याजाची रक्कम जिल्हाधिकारी कार्यालय ठरवेल त्याप्रमाणे ज्या तारखेपासून मोबदला घेतला असेल त्या तारखेपासून अशा ६.२५ टक्के जमिनीचा ताबा घेण्याच्या तारखेच्या मुदतीपर्यंत) प्राधिकरणाला परत करावी लागेल.

४. अशा जमिनीचा परतावा करताना सदर भूखंडाकरिता अनुज्ञेय असलेला २.०० चटई क्षेत्र निर्देशांक विनामूल्य मंजूर करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. एकत्रिकृत विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावलीतील तक्ता क्र. ६जी मध्ये २.०० चटई क्षेत्र निर्देशांक हा पूर्ण पणे मोफत नाही. यामध्ये मूळ १.१० च.क्षे.नि. विनामुल्य अनुज्ञेय आहे. त्यापुढील ०.५० व ०.४० च.क्षे. नि. हे अनुक्रमे प्रिमियम व टिडीआर स्वरूपात सशुल्क देण्याची तरतूद आहे. सदर प्रकरणी २.०० चटई क्षेत्र निर्देशांक विनामूल्य द्यावयाच्या असल्याने त्यासाठी केवळ सदर प्रकरणापुरता महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७(१कक) अन्वये कार्यवाही करून सदर तरतूद लगोलग अंमलात आणण्याकरिता महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या कलम १५४ अन्वये निदेश देण्यात येत आहेत.

६. ज्या शेतकऱ्यांना सदर शासन निर्णयाचा फायदा घ्यावयाचा असेल त्यांनी प्रथमत: न्यायालयात दाखल केलेल्या सर्व प्रकारच्या याचिका/प्रकरणे विनाशर्त मागे घेणे बंधनकारक राहील.

७. प्राधिकरणाने या आदेशान्वये जमीन मालकांना परत केलेली जमीन दुसऱ्या व्यक्तीस राज्य शासनाच्या पूर्व परवानगीने, कोणत्याही प्रकारची रक्कम प्राधिकरणास न देता हस्तांतरीत करता येईल. मात्र यासाठीचा प्रस्ताव प्राधिकरणाने छाननी करून आपल्या अभिप्रायासह शासनास पूर्वमान्यतेसाठी सादर करावा. परंतु अशा दुसऱ्या व्यक्तीस ती जमीन त्यापुढे शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय व नियमानुसार अनर्जित रकमेचा विहित भाग प्राधिकरणास दिल्याशिवाय हस्तांतरीत करता येणार नाही.

८. नगर विकास विभागाच्या दिनांक ७ जून, २०२१ रोजीच्या अधिसूचनेतील अट क्र.६ मध्ये १२.५% व ६.२५% जमीन परताव्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्याचे अधिकार पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचेकडे राहतील, अशी सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

९. यापूर्वी घेण्यात आलेल्या निर्णयानुसार १२.५% प्रमाणे जमीन परतावा तसेच या निर्णयानुसार ६.२५ टक्के जमिनीचा परतावा देताना जमीन मालक अथवा जमीन मालकाच्या कायदेशीर घोषित वारसाची कागदपत्रे तपासून कायदेशीर जमीन मालकास अथवा वारसास परतावा देण्याबाबतची कार्यवाही पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करावी.

१०.सदर प्रकरणी जमीन परतावा करण्यापोटी पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण/पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांना राज्य शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य अथवा नुकसान भरपाईची मागणी करता येणार नाही.

११. या प्रकरणी प्राधिकरणाद्वारे सदर जमिनींच्या भूसंपादनासाठी आलेला खर्च निघेल याबाबतची खबरदारी पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने घ्यावी.

सदरचा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.४७८/व्यय-३, दि.२३.०२.२०२४ व मा. मंत्रीमंडळाने दि. ११.०३.२०२४ रोजी दिलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१४१३४२४३६६२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.14 13:52:29 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) महोदय यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त) महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
१०) जिल्हाधिकारी, पुणे.
११) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका.
१२) उप सचिव (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती (नवि-७).